**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
शासन निर्णय क्रमांक: रापोसे-१४०८/प्र.क्र.५८५/पोल-१(अ)
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक : **१२ ऑगस्ट, २००९.**

**वाचा :-** महाराष्ट्र लोकसेवा आयोग पत्र क्रमांक- ९८६ (७)/१४५९/आठ, दि.१.१०.२००८

**शासन निर्णय:-** पोलीस उप अधीक्षक / सहायक पोलीस आयुक्त, बिनतारी संदेश (अभियांत्रिकी), राज्य पोलीस सेवा, गट-अ या संवर्गातील पदासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या खाली दर्शविलेल्या ५ उमेदवारांची परिविक्षाधीन पोलीस उपअधीक्षक / सहायक पोलीस आयुक्त, बिनतारी संदेश (अभियांत्रिकी) म्हणून परिच्छेद क्र.३ मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तीनुसार स्थानापन्न नियुक्ती करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | उमेदवाराचे नांव | आयोगाने नियुक्तीसाठी शिफारस केलेला प्रवर्ग |
|---|---|---|
| १ | श्री.प्रतीक भालचंद्र देशपांडे | खुला |
| २ | श्री.धनंजय दामोदर पाटील | खुला |
| ३ | श्री.सुनिल मोहन सावंत | खुला |
| ४ | श्री.चंद्रकांत अंबादास ढाकणे | खुला |
| ५ | श्री.गिरिश अरुण ठाकरे | इ.मा.व. |

२. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या ७ उमेदवारांपैकी श्री.ईश्वर दामू कांबळे व श्री.प्रकाश भालचंद्र थविल यांनी नियुक्ती स्विकारण्यास नकार दिला आहे. सदर २ उमेदवार वगळता, परिच्छेद-१ मध्ये नमूद केलेले ५ उमेदवार हे परिविक्षाधीन पोलीस उपअधीक्षक/सहायक पोलीस आयुक्त पदावर नियुक्तीसाठी अभियोग्य असल्याचे आढळून आले आहे.

**३. वरील उमेदवारांची नियुक्ती खालील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून करण्यात येत आहे :-**

१) उमेदवारांचा परिविक्षाधीन कालावधी ते नियुक्तीच्या पदावर रुजू झालेल्या तारखेपासून दोन वर्ष असेल. नियुक्तीवर रुजू होण्याची तारीख त्यांना नंतर कळविण्यात येईल.

२) अपर पोलीस महासंचालक व संचालक, पोलीस बिनतारी संदेश, पुणे यांनी विहित केलेला अभ्यासक्रम व प्रशिक्षण उमेदवारांना पूर्ण करणे बंधनकारक राहील.

३) उमेदवारांना परिविक्षा कालावधीमध्ये रु.८०००-२७५-१३,५००/- या असुधारीत वेतनश्रेणीत दरमहा रु.८०००/- इतके वेतन मिळेल. परिविक्षा कालावधीतील एक वर्ष पूर्ण झाल्यानंतर पहिली वार्षिक वेतनवाढ

देण्यात येईल. व त्यानंतरची वेतनवाढ परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केल्यावर शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-१३७०/डी, दिनांक १२.४.१९७२ नुसार देण्यात येईल. त्यांना नियमाप्रमाणे महागाई भत्ता व इतर भत्ते अनुज्ञेय राहतील.

४) उमेदवारांना शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अंनियो-१००५/१२६/सेवा-४, दि.३१.१०.२००५ च्या तरतुदीनुसार "परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना" (Defined Contribution Pension Scheme) लागू राहील.

५) उमेदवारांना नियुक्तीवर रुजू होण्यासाठी कराव्या लागणाऱ्या प्रवासासाठी प्रवासभत्ता मिळणार नाही.

६) उमेदवारांनी दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी किंवा त्यानंतर वाढविलेला परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केल्यानंतर त्यांची पोलीस उपअधीक्षक / सहायक पोलीस आयुक्त, बिनतारी संदेश (अभियांत्रिकी) या संयुक्त संवर्गात नेमणूक केली जाईल.

७) उमेदवार जर दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीच्या आत किंवा वाढविलेल्या परिविक्षा कालावधीमध्ये कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त करु शकले नाहीत आणि / किंवा विहित विभागीय परिक्षा / चाचण्या उत्तीर्ण झाले नाहीत किंवा गैर वर्तणूकीबद्दल दोषी आढळले किंवा पोलीस सेवेस अभियोग्य नसतील तर त्यांची सेवा समाप्त करण्यात येईल.

८) उमेदवारांना नियमाप्रमाणे विहित मराठी व हिंदी भाषा परिक्षा उत्तीर्ण व्हावे लागेल.

९) उमेदवारांना शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दि.१९.३.२००३ अन्वये शासन सेवेत नियुक्तीकरिता संगणक हाताळणी/ वापराबाबतचे आवश्यक ते प्रमाणपत्र विविक्षित वेळेत विभाग प्रमुखाकडे सादर करणे आवश्यक राहील.

१०) उमेदवारांना वर नमूद केलेल्या अटी व शर्ती व्यतिरिक्त महाराष्ट्र शासनाच्या अधिपत्याखालील राज्यसेवा अधिकाऱ्यांना जे सेवाविषयक नियम सामान्यतः लागू आहेत ते त्यांनाही लागू होतील.

४. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २००९०८१२१७१४१५००१ हा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

**( प्र. भि. चव्हाण )**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

- महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

प्रतिलिपी,

- अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई
- अपर पोलीस महासंचालक व संचालक, पोलीस बिनतारी संदेश, पुणे
- संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक.
- महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा) महाराष्ट्र, मुंबई.
- महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा) महाराष्ट्र, नागपूर.
- सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, बँक ऑफ इंडियाची मुख्य इमारत, ३ रा मजला, महात्मा गांधी मार्ग,मुंबई-४०० ००१
- अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
- निवासी लेखा परिक्षा अधिकारी , मुंबई.
- जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/नाशिक.
- सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-८, मंत्रालय, मुंबई.
- निवडनस्ती-पोल-१अ.
- (१) श्री.प्रतीक भालचंद्र देशपांडे, प्लॉट नं.५, पी.एम.जी.सोसायटी, नरेंद्र नगर, नागपूर-४४० ०१५
- (२) श्री.धनंजय दामोदर पाटील, द्वारा-डी.पी.पाटील, विजय पाईप फॅक्टरीशेजारी, ढेकू-सीम रोड, अमळनेर, जि.जळगांव, पिनकोड-४२५ ४०१.
- (३) श्री.सुनिल मोहन सावंत, ५०१, कल्याणी टॉवर्स, पंतनगर, घाटकोपर (पूर्व), मुंबई-४०० ०७५.
- (४) श्री.चंद्रकांत अंबादास ढाकणे, ८६४, एन-५ (दक्षिण), सह्याद्री नगर, सिडको, न्यू औरंगाबाद-४३१ ००३.
- (५) श्री.गिरिश अरुण ठाकरे, ५६, न्यू प्रभात कॉलनी, बडनेरा रोड, अमरावती-४४४ ६०६.